**कोकण विकास पॅकेज अंतर्गत बंदरातील गाळ उपसणी करण्याकरीता ड्रेजर युनिट खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता .**

**शासन निर्णय**
**गृह विभाग**
**शासन निर्णय पीएलएन ११०९/ प्र क्र ३०१ / बंदरे -२,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक ०६ मार्च, २०१०.**

**वाचा :-**

१) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. पीएलएन ०६०९/प्र क्र ८२/बंदरे-१, दिनांक ६ ऑगस्ट, २००९.

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांनी सचिव (बंदरे), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना लिहीलेले पत्र क्र. ममेबो / मुकाअ / साअधिस/कोकण पॅकेज/ड्रेजिंग/ ३२२, दिनांक ९ नोव्हेंबर, २००९.

३) मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांनी सह सचिव (परिवहन / बंदरे), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना लिहीलेले पत्र क्र. ममेबो / मुकाअ/ साअधिस/कोकण पॅकेज/ड्रेजिंग/ ०१, दिनांक २ जानेवारी, २०१०.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याला ७२० कि.मी. लांबीचा समुद्रकिनारा लाभलेला असून या किनारपट्टीजवळील ४८ लहान बंदरे आहेत. या बंदरांमधील खाडी, नद्या आणि समुद्रकिनारपट्टीचा वापर जलवाहतूकीच्या दृष्टीने पुर्वापार पासून करण्यात येत आहे. तथापि, पाण्याचा वेग, पावसाळयातील वादळी हवामान, समुद्रांतर्गत चालू असलेली सागरतळाची व किनारवर्ती प्रदेशाची झीज व संचयनाची नैसर्गिक प्रक्रीया यामुळे बंदरातील जलमार्ग मोठ्या प्रमाणात गाळाने भरली गेली आहेत. या बंदरांमधील प्रवासी व माल वाहतूक सुरळीत व जलद होण्यासाठी मोठ्या प्रमाणावर गाळ उपसणी करणे क्रमप्राप्त ठरले आहे. या कामासाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे स्वतंत्र यंत्रणा असणे आवश्यक आहे. तसेच नौवहन जलद व सुरळीत झाल्यास प्रवासी बंदरांचा विकास, मत्स्य बंदरांचा विकास, पर्यटन विकास व जलवाहतूकीचा विकास साध्य होणे शक्य होईल. ही बाब विचारात घेवून बंदरे व खाड्यांमधील नौवहन सुरळीत होण्याच्या दृष्टीने गाळ उपसणी करण्यासाठी मंत्रीमंडळाने दि. २४.६.२००९ रोजी झालेल्या बैठकीत पुढील प्रस्तावास मंजुरी दिलेली आहे.

" गाळ उपसणी करण्याकरिता चार ड्रेजर युनिट खरेदीसाठी रु. ६० कोटी मंजूर करण्यात आले. यापैकी सन २००९-१० मध्ये एक व त्यांची उपयुक्तता पाहून सन २०१०-११ मध्ये एक व सन २०११-१२ मध्ये दोन अशी ड्रेजर खरेदी करण्यात यावी. या कामांसाठी निधी गृह विभागाच्या (बंदरे) उपलब्ध नियतव्ययातून उपलब्ध करुन देण्यात यावा." हा निधी प्रतीवर्षी रु. २० कोटी याप्रमाणे ३ वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेला आहे.

त्याअनुषंगाने ड्रेजर युनीटकरीता बांधणी नकाशे व तांत्रिक बाबी (Technical Specifications) निश्चित करुन २०० घन मीटर प्रती तास गाळ उपसणी क्षमतेचा १ कटर सक्शन ड्रेजर व २५० घन मीटर क्षमतेचे २ स्वंयचलित हॉपर बार्ज यांच्या खरेदीसाठी अंदाजित रु. १६.२० कोटी खर्चाचा प्रस्ताव महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने तयार केला आहे. तसेच, या खरेदीसाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून जागतिक निविदा मागविण्यात आल्या आहेत.

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने उपरोक्त "वाचा" येथे क्रमांक (२) व (३) येथील पत्रान्वये ड्रेजर युनिट खरेदीकरीता प्रशासकीय मान्यतेसाठी सविस्तर प्रस्ताव शासनास सादर केला आहे. या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

कोकण विकास कार्यक्रमातंर्गत सन २००९-१० या आर्थिक वर्षाकरीता महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डासाठी १ कटर सक्शन ड्रेजर व २ स्वंयचलित हॉपर बार्ज यांच्या खरेदीसाठी रु. १६,२०,००,०००/- (अक्षरी रुपये सोळा कोटी वीस लक्ष फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त ड्रेजर युनिटची सर्वसाधारण तांत्रिक अर्हता व समाविष्ट घटक पुढील प्रमाणे आहेत :-

| साधारणपणे तांत्रिक अर्हता | संख्या | अंदाजित किंमत (रुपये कोटी) |
|---|---|---|
| **Cutter Suction Dredger** - Design, Construction, Transportation, Erection and Commissioning of Two Dismountable Hydraulic cutter suction Diesel Power Driven Engine, Dredger for dredging silt, clay and gravel and admixture of said to provide the dredging facilities in the minor ports, fisheries harbour etc. Where maximum draft available 1 m-1.5m and to be suitable for dredging up to a 6-8 mtrs dredging depth with output of approx .200 cum. per hour. | १ | ६.४८ |
| **Twin Screw Self Propelled Hopper Barge - 250 cum.**<br>Length O. A.: 41.00m<br>Breadth mld.: 8.00m<br>Depth mld.: 2.80m<br>Draught mld.: 1.80m<br>Speed (min): 6 Knots<br>Hopper Capacity: 250 cum up to the top of overflow<br>Enduarance: 500 nautical miles<br>Complement: 9 persons (1 master, 1 driver & 7 crew) | २ | ९.७२ |
| एकूण अंदाजित किंमत | | १६.२० कोटी |

३. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी चिफ सर्व्हेअर व मरीन इंजिनिअर, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

४. या प्रयोजनासाठी होणारा खर्च " मागणी क्रमांक बी-७, लेखाशिर्ष ३०५१, बंदरे व दिपगृहे, १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रम यांना सहाय्यक अनुदान, (०२) लहान बंदरे, (०१) मेरीटाईम बोर्डास सहायक अनुदान (०१) (०६) नौका समूहाची खरेदी (राज्य) (३०५१ ०७४१) (योजनांतर्गत) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. तसेच सदर खर्च सन २००९-१० या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा. या प्रयोजनासाठी उपरोक्त निधी, अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) च्या माध्यमातून संगणकाव्दारे वितरीत करण्यात येईल.

५. उपरोक्त तरतूद खर्च करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत ड्रेजिंग युनिट महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाच्या नियंत्रणाखाली राहील. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाच्या वापराव्यतिरिक्त इतर शासकीय / खाजगी आस्थापना यांना सदर ड्रेजिंग युनिट सार्वजनिक बांधकाम विभागाच्या उपकरणे व सामुग्री भाडेतत्वावर देणे या पध्दतीने भाडेतत्वावर उपलब्धतेनुसार पुरविण्यात येईल. तसेच, त्याव्दारे प्राप्त होणाऱ्या महसुलामधून या यंत्रणेमधील उपकरणांची दैनंदिन देखभाल व दुरुस्ती तसेच परिरक्षणाचा खर्च भागविण्यात येईल.

७. प्रस्तुत शासन निर्णय, कोकण विकास कार्यक्रमातंर्गत मंत्रीमंडळाने दि. २४.६.२००९ रोजी झालेल्या बैठकीत देण्यात आलेल्या मान्यतेनुसार तसेच नियोजन व वित्त विभागाच्या सहमती नुसार वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६४/१०/व्यय-८, दि. २५ फेब्रुवारी, २०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर अपलोड करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००३०३१६३३४५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प्र. ना. गौड)
सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई (५ जादा प्रतींसह)

वित्त विभाग (व्यय-८, अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२
अवर सचिव, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
नियोजन विभाग, (का. १४५२, १४५४, १४५६), मंत्रालय, मुंबई - ३२
निवडनस्ती (बंदरे-२)